महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) या संवर्गातून अधिक्षक कृषि अधिकारी, गट-अ संवर्गात पदोन्नती.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांक: आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे (४७)**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ०५ एप्रिल, २०२३.

<u>संदर्भ:</u>- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब,दि.०७/०५/२०२१,
२) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्रमांक आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे(१), दि.३०/१२/२०२२
३) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्रमांक आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे(२), दि.३०/१२/२०२२
४) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्रमांक आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे, दि.३१/०१/२०२३
५) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्रमांक आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे(१), दि.२७/०२/२०२३
६)कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्रमांक आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे(२), दि.२७/०२/२०२३
७) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्रमांक आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे(३), दि.२७/०२/२०२३
८) कृषि व पदुम विभाग,शासन आदेश क्रमांक आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे(१), दि.३१/०३/२०२३
९) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्रमांक आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे(२), दि.३१/०३/२०२३
१०)कृषि व पदुम विभाग,शासन आदेश क्रमांक आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे(३),दि.३१/०३/२०२३

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) संवर्गातून महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी) या संवर्गात तात्पुरत्या पदोन्नतीसाठी या विभागामार्फत तयार करण्यात आलेल्या सन २०२१-२२ च्या निवडसुचीस सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन, खाली नमुद अधिकाऱ्यास महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) (वेतनश्रेणी एस-२० : रु.५६१०० - १७७५००/-) संवर्गातून सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी) (वेतनश्रेणी एस-२३ : रु.६७७०० -२०८७००/-) या संवर्गात निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने खालीलप्रमाणे पदस्थापना देण्यास या शासन आदेशान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

| क्र. | कृषि उप संचालक ज्येष्ठता.क्र | निवड सूचीतील अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | प्रवर्ग | वाटप महसुल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | ११८ | ५९ | श्री.सागर भारत खटकाळे, उपविभागीय कृषि अधिकारी, विटा जि. सांगली | खुला | कोकण-२ | कृषि अभियंता, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई (रिक्त पदी) |

२. उपरोक्त तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**(अ)** सदर तात्पुरती पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयास अधिन राहुन देण्यात येत आहेत.

**(आ)** रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५/०५/२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

**(इ)** सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्यामुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

३. महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी) या संवर्गात तात्पुरत्या पदोन्नतीसाठी सन २०२१-२२ च्या निवडसुचीनुसार संदर्भ क्र.२ ते १० येथे नमूद शासन आदेशान्वये ९ अधिकाऱ्यांच्या तात्पुरत्या पदोन्नतीचे आदेश यापुर्वीच निर्गमित करण्यात आले आहेत.

४. महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी) या संवर्गात तात्पुरत्या पदोन्नतीसाठी सन २०२१-२२ च्या निवडसुचीतील अधिकाऱ्यांची परस्पर सेवा ज्येष्ठता सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार राहील.

५. श्री.सागर भारत खटकाळे,उपविभागीय कृषि अधिकारी, विटा जि. सांगली यांनी त्यांच्या सध्याच्या पदाचा पदभार निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रुजू व्हावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४०६००२२३२७१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.04.06 00:27:49 +05'30'

**( सरिता बांदेकर-देशमुख )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (कृषि) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा)१/२ महाराष्ट्र मुंबई /नागपूर.
१०. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (द्वारा-आयुक्त (कृषि) पुणे)
११. सर्व सह सचिव /उप सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. उप सचिव (का.१२/ का.१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व विभागीय कृषि सहसंचालक/ अधिक्षक कृषि अधिकारी, (द्वारा-आयुक्त (कृषि) पुणे)

१४. कृषि सहसंचालक, (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे.

१५. कृषि अभियंता, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई

१६. उपविभागीय कृषि अधिकारी, विटा जि. सांगली

१७. श्री.सागर भारत खटकाळे,उपविभागीय कृषि अधिकारी, विटा जि. सांगली

१८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (द्वारा-आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे)

१९. निवड नस्ती, १५-अे कार्यासन.